# रिलीफ

**-- चं.प्र.देशपांडे.**

समोर दोन खुर्च्या. वृध्द आणि तरुणी बसलेले.

तरुणीः तर तुमच्या आठवणी हा विषय चालला होता. आपण भलतीकडेच वाहवत गेलो. आता पुन्हा मूळ विषयावर येऊ या. तुमच्या आठवणी.

वृध्दः आठवणी आहेत. पण त्या क्रमानं नाहीत. त्यांची तीव्रताही कमीजास्त आहे. एखादी पन्नास वर्षांपूर्वीची गोष्ट आत्ता नुक्ती घडल्यासारखी ताजी आहे पण एखादी कालचीच गोष्ट आठवणारही नाही. पण मी तसा ्आत्तापर्यंत जगत आलेलो आहे याबद्दल शंका नाही. उदाहरणार्थ परवा उमेदवार भेटला होता. विवंचनेत होता. निवडून येण्याची खात्री आहे म्हणाला. मग म्हटलं कसली विवंचना ? तर त्यानं मुख्यमंत्री व्हावं अशी बऱ्याच जणांची इच्छा आहे म्हणाला. त्यांची मनं दुखावली जाऊ नयेत म्हणून तो विवंचनेत होता.

तरुणीः नंतर मला भेटला तेव्हा तो मुख्यमंत्री झाला होता. पण दुःखात होता. त्याचा हाताशी आलेला, डॉक्टर झालेला मुलगा वारला होता. त्याला परीक्षेत पास करून घेतला होता म्हणतात.

वृध्दः ड्रगॲडिक्ट होता तो. अशाअशा प्रकारचं जगणं असलं की असंअसं होणारच.

तरुणीः त्यानं मुख्यमंत्री व्हायचं डोक्यात घेतलं नसतं तर त्याचं जगणं वेगळं झालं असतं आणि मग मुलगा गेला नसता.

वृध्दः पण मग मुख्यमंत्रीपद हरपलं असतं.

तरुणीः तुम्ही अशा माणसाला मत दिलं असतं ?

वृध्दः मी नेहमीच कुठल्याही मुख्यमंत्र्याला धरून राहिलो. मला माझी कारखानदारी वाढवायची होती. या माझ्या वागण्याचे परिणाम मीही सहन केलेयत. माझ्या आयुष्यात.

तरुणीः म्हणजे विचारस्वातंत्र्याचा उपयोग करून तुम्ही मत देत नव्हता.

वृध्दः आपल्या आवडीनिवडी आणि आपले फायदेतोटे यांच्याव्यतिरिक्त कुणी करू शकतं विचार ? मुळात असा विचार असू तरी शकतो का ?

तरुणीः मग तो मुलगा ड्रगॲडिक्ट होऊन मेला याला तुम्हीही कारणीभूत आहात.

वृध्दः आणि तूही.

तरुणीः मला सुचेनासं झालंय.

वृध्दः मलाही. असं आयुष्यात बरेच वेळा होऊन गेलंय.

तरुणीः तुम्ही वेगळं वागायला हवं होतं.

वृध्दः तू वागतेयस वेगळं ?

तरुणीः म्हणजे कसं ?

वृध्दः तेच मी विचारतोय.

तरुणीः मला सुचेनासं झालंय.

वृध्दः मलाही.

तरुणीः बहुतेक मला दुःख होतंय.

वृध्दः मलाही. असं अनेक वेळा झालंय.

तरुणीः मुख्यमंत्र्याच्या सांत्वनाला जावं का ?

वृध्दः किंवा मी करतो तुझं सांत्वन ?

तरुणीः लोक काहीही बोलतात. उदाहरणार्थ आपणही.

वृध्दः शेवटी कोर्टाचा निर्णय महत्त्वाचा. उगीच काही कुणी कुणाला जबाबदार धरू शकत नाही. प्रत्यक्ष खून केल्याचं सिध्द झालं तरच प्रश्न येतो.

तरुणीः मग हरकत नाही.

वृध्दः तेच म्हणतोय मी.

तरुणीः आपण डळमळलो तर जगायचं कसं मग ?

वृध्दः करेक्ट !

तरुणीः आता मला रिलीफ वाटतोय.

वृध्दः मलाही. असा अनेकदा वाटून गेलाय. त्याचाच आता थकवा झालाय -- थकवा ! बहुतेक !
( उठतो. उभा राहतो. थकलेला. हळूहळू चालत विंगेकडे जातो. एखाद्या यशस्वी माणसाकडे पाहावे तशा आदरानं तरुणी त्याच्याकडे पाहतेय...)

... पडदा पडत जातो...



पत्ता -**चं.प्र.देशपांडे,**
३, स्नेहदीप अपा.
चिंतामणीनगर,
सहकारनगर नं.२, पर्वती,
पुणे - ४११ ००९.

**दूरध्वनी - ४२२ ७८४७..**